# हेरवाडची भानामती

# आणि अंधश्रद्धा निर्मूलन समितीची शरणागती






प्र ४

## हेरवाडची भानामती

### आणि अंधश्रद्धा निर्मूलन समितीची शरणागती

१४ ऑगस्ट १९९३ च्या बेळगाव **दै. तरुण भारत**मध्ये '**बेडकीहाळ गावात भानामतीमुळे बालिकेच्या अंगावरील कपडे गायन- अंधश्रद्धा निर्मूलन समितीला आव्हान**' या मथळ्याची एक बातमी प्रसिद्ध झाली. अशी एखादी बातमी प्रसिद्ध होताच प्रस्तुत लेखक ताबडतोब तेथे हजर होतो. त्याप्रमाणे तो तेथे म्हणजे बेडकीहाळ, ता. चिक्कोडी, जि. बेळगाव येथे गेला. नंतर ज्या मुलीच्या अंगावरील कपडे गायब होत होते त्या मुलीच्या आईच्या सासरी हे प्रकार मुळात सुरू झाल्याचे

कळल्यामुळे तो तेथेही म्हणजे हेरवाड, ता. शिरोळ, जि. - कोल्हापूर या गावीही गेला. तेथे अंधश्रद्धा निर्मूलन समितीचे लोक इचलकरंजीच्या - **दै. मैचेस्टर** मध्येच अशीच बातमी प्रसिद्ध झाल्यामुळे (ती बेडकीहाळच्या वार्ताहरानेच दिली होती. ) व अंधश्रद्धा निर्मूलन समितीला हे आव्हान आहे असे त्याही बातमीत म्हटले असल्यामुळे आलेले आढळले. (एरवी ते भानामतीसारख्या त्यांना अडचणीत टाकणाऱ्या घटनांकडे मुद्दाम दुर्लक्ष करतात हा नेहनीचा अनुभव.) हे 'अंनिस'चे लोक चार किलोमीटर अंतरावरील कुरुंदवाडचे होते. एवढ्या जवळचे असूनही ते त्यानंतर त्या घराकडे फिरकले नाहीत हे लक्षात ठेवण्यासारखे आहे ! नाही म्हणायला एकदा दोघेजण रस्त्यावरून जाता जाता कारण हे घर हेरवाड - गावालगतच मळ्यात कुरुंदवाड-कोल्हापूर रस्त्याला अगदी लागून आहे सहज चौकशी करून गेले. लेखकाने मात्र त्यानंतर सतत एक वर्षपर्यंत या भानामतीचा पिच्छा पुरवला. ही भानामती सात वर्षापासून हेरवाडच्या संबंधित घराला पीड होती. पण तिची वृत्तपत्रातून बातमी फुटल्यामुळेच सर्वांना ही माहीत झाली. हेरवाडच्या संबंधित घरातील मुख्य केंद्रीभूत व्यक्ती सौ. विमल मल्लाप्पा नेलें ही बेडकीहाळ या आपल्या माहेरी गेली असता तेथेही हा भानामतीचा प्रकार सुरू झाल्यामुळे तिच्या आईवडिलांच्या शेतमालकाला जे बेळगावात राहतात, पण अधूनमधून बेडकीहाळला येतात त्या संजय कुलकर्णी यांना कळला व त्यांनी बेळगाव व इचलकरंजी येथील उपर्युक्त वृत्तपत्रांना (त्यांच्या बातमीदारांना) बातमी दिली. याच्यापूर्वी संबंधित घराचा भानामतीपीडित तरुण (जो इचलकरंजी येथील सूतगिरणीत काम करतो.) श्री. मल्लाप्पा बसाप्पा नेलें याने इचलकरंजीच्या अंधश्रद्धा निर्मूलन समितीच्या एका प्रमुख व प्रसिद्ध कार्यकर्त्यास आपल्या घरच्या दीर्घकाळ चालू असलेल्या भानामतीचा बंदोबस्त करावा अशी लेखी विनंती करूनदेखील त्या कार्यकर्त्याने उडवाउडवीची उत्तरे देऊन म्हणजे आमच्या येण्याजाण्याच्या व्यवस्थेसाठी खास गाडी देत असाल तर येऊ वगैरे सांगून, आपली सुटका करून घेतली होती पण वृत्तपत्रात उघडउघड अंधश्रद्धा निर्मूलन समितीला हे आव्हान आहे अशी बातमी प्रसिद्ध झाल्यामुळे जवळच्याच कुरुंदवाडच्या 'अंनिस'च्या लोकांना त्याची नाइलाजाने दखल घ्यावी लागली त्या लोकांना मात्र प्रस्तुत लेखकाने स्वतची ओळख न देता स्वतंत्रपणे या भानामतीची तपासणी केली. ऑगस्ट अखेर पूर्ण तपास केल्यानंतर लेखकाने महाराष्ट्र 'अंनिस' चे कार्याध्यक्ष डॉ. दाभोळकर यांना या

भानामतीसंबंधी खालील पत्र लिहून रजि. पोस्टाने पाठविले. पण ते refused म्हणून परत आले ! ज्योतिषशास्त्रविषयक आव्हानाचे माझे पूर्वीचे रजि. पत्र स्वीकारण्याची ( त्यांच्या पत्नीने ? ) चूक केल्यानंतर दाभोळकर सावध झाले होते हे यावरून उपड होते. ते पंत्र जसेच्या तसे येथे देत आहे. ते वाचल्यानंतर दाभोळकरांनी एक तर भानामतीचा कसा धसका घेतला आहे किंवा माझे पत्र भानामतीविषयी आहे हे त्यांना माहीत नसेल तर सत्याला सामोरे जाण्यास ते कसे भितात ( कारण माझा आग्रह नेहमी सत्याला सामोरे जाण्याचा असतो हे त्यांना माहीत आहे.) याची वाचकांना कल्पना येईल.

रजिस्टर पोस्ट ए. डी.

अद्वयानंद गळतगे (निवृत्त प्राचार्य)

भोज (बेळगाव)

कर्नाटक

१९.९.९३

प्रति,

डॉ. नरेंद्र दाभोळकर

कार्याध्यक्ष, अंधश्रद्धा निर्मूलन समिती, सातारा.

स. न.

**हेरवाड** (ता. शिरोळ, जि. कोल्हापूर) येथील एक रहिवासी श्री. मल्लाप्पा बसाप्पा नेलें (वय ३०, शिक्षण- १० वी, धंदा- शेती व इचलकरंजी सूत गिरणीत कामगार) याच्या घरी गेल्या सात वर्षांपासून जे प्रकार घडत आहेत त्या संदर्भात मी हे पत्र लिहीत आहे. या प्रकारांबाबत वृत्तपत्रांतून आपल्या अंधश्रद्धा निर्मूलन समितीला आवाहन केल्यामुळे समितीच्या (कुरुंदवाडच्या लोकांनी त्या ठिकाणी जाऊन या प्रकारांची तपासणी केली आहे. तशी ती मीही केली आहे. माझी काही आपल्याप्रमाणे समिती नाही. मी कोणत्याही विचारप्रणालीच्या दावणीला बांधला

गेलेलो नाही. माझे उद्दिष्ट केवळ सत्यशोधन हेच आहे. विज्ञानाचेही हेच उद्दिष्ट असल्याचे प्रसिद्धच आहे. या अर्थाने मी विज्ञानपद्धतीच्या बंधनाने बांधला गेलो आहे असे मात्र अवश्य म्हणता येईल. आपल्या समितीचे धोरणसुद्धा विज्ञानपद्धतीचा पुरस्कार करणे हेच असल्याचे घोषित झाले आहे. आणि म्हणूनच केवळ मी हे पत्र आपल्याला लिहीत आहे. एरवी माझा आपल्याशी संपर्क साधण्याचे काहीच कारण नाही.

माझे आपल्या समितीच्या उद्दिष्टाशी कसलेही भांडण नाही. कोणत्याही सुबुद्ध माणसाचे ते असण्याचे कारण नाही. माझे म्हणणे इतकेच की हेरवाडमध्ये जे प्रकार घडले आहेत व अजूनही घडत आहेत त्या प्रकारांची वस्तुनिष्ठ तपासणी करून मगच त्याविषयी निष्कर्ष काढावेत. त्यांची अगोदरच अंधश्रद्धेत गणना करून त्यांची 'तपासणी' करू नये. तसे केले तर निष्कर्ष दूषित होतात. हे विज्ञानपद्धतीच्या विरुद्ध आहे. या दृष्टीने विचार केला तर मात्र आपल्या समितीचे घोषित धोरण व प्रत्यक्ष कृती यात विरोध आढळून येतो. आणि मग माझ्यासारख्या विज्ञानवृत्तीच्या माणसाला गप्प बसणे कठीण जाते. अशावेळी समितीला हटकण्यावाचून गत्यंतर उरत नाही. म्हणून मी या पत्राद्वारा आपल्या समितीला काही प्रश्न विचारू इच्छितो. त्यांची आपण उत्तरे द्याल असा विश्वास वाटतो. हे प्रश्न मी तेथील घटनांचे जे निरीक्षण व तपासणी केली आहे त्याच्या आधारेच विचारत आहे.

या घटनांची पार्श्वभूमी अशी आहे हे घटनाप्रकार उपर्युक्त मल्लाप्पाचे सात वर्षांपूर्वी लग्न झाल्यानंतर सहा महिन्यांनी सुरू झाले आहेत. तत्पूर्वी. त्यांच्या कुटुंबात असे प्रकार कधीच घडलेले नाहीत. त्यामुळे ज्यांचा 'भानामती'वर विश्वास आहे ते लोक ही भानामती मल्लाप्पाच्या बायकोमुळे आली असे म्हणतात. तर ज्यांचा भानामतीवर विश्वास नाही ते लोक हे प्रकार मल्लाप्पानी बायको विमल हीच मुद्दाम करीत असते असे म्हणतात. मल्लाप्पाचे लग्न व त्याच्या बहिणीचे लग्न एकाच मुहूर्तावर झाले असल्यामुळे त्याची बायको आली व बहीण सासरी गेली. माणसे पूर्वीप्रमाणे चारच उरली. मल्लाप्पा, मल्लाप्पाचे आई वडील व बायको. तेव्हा या प्रकारांचे जनकत्व या चार माणसांव्यतिरिक्त दुसऱ्या कोणाकडेही जात नाही. या चारपैकी एकच व्यक्ती - विमल ही नवीन असल्यामुळे व ती आल्यानंतरच हे प्रकार

सुरू झाले - असल्यामुळे तिच्याकडेच या प्रकारांचे जनकत्व मग ते प्राकृतिक असो वा - अतिप्राकृतिक जावे हे स्वाभाविकच आहे. आता हे घटनाप्रकार कोणते हे पाहू.

(१) ज्या ज्या वेळी मल्लाप्पाची बहीण किंवा तिचा नवरा घरी आले त्या त्या वेळी मल्लाप्पाच्या पँटच्या खिशातील पैसे गेले आहेत. सुरुवातीला मल्लाप्पाला त्यांचा संशय आला नाही. पण ते असे वरचेवर जाऊ लागल्यामुळे त्यांचा त्याला संशय येऊन त्यांच्यात वितुष्ट आले. पण त्यांनी ते घेतलेले नाहीत, किंवा मल्लाप्पाला संशय यावा म्हणून बायको विमलनेही ते घेतलेले नाहीत याची खात्री मल्लाप्पाला पुढील घटना प्रकारामुळे झाली.

(२) एकदा मल्लाप्पाची बहीण विजया व तिचा नवरा मल्लाप्पाच्या घरी मुक्कामाला होती. माजघरात दोघेही रात्री झोपली. झोपण्यापूर्वी त्यांनी दरवाजा आतून बंद करून कडी लावली. मल्लाप्पाची बायको व सासूसासरे बाहेरच्या खोलीत झोपली. (मल्लाप्पा गिरणीत पाळीला गेला होता.) सकाळी उठल्यानंतर माजघरातील कोपऱ्यात मल्लाप्पाच्या वडिलांना आपले जमिनीचे कागद इतस्तत: विखुरलेले आढळले. मुलगीला व जावयाला विचारता आपणाला हे कोणी केले माहीत नाही, असे ते म्हणाली. झोपण्यापूर्वी ते तसे विखुरलेले नव्हते हे मात्र खरे हे त्यांनी मान्य केले. त्यांना ते कागदपत्र कुलूप नसलेल्या ट्रंकेतील बॅगेतून काढून पाहायचेच होते तर ते त्यांनी पाहून परत जसेच्या तसे ठेवले असते. यावरून त्यांचे ते कृत्य नव्हते हे सिद्ध होते. त्यांनी आतून दाराला कडी लावलेली असल्यामुळे बाहेरच्या कुणाचे हे कृत्य असणे शक्य नव्हते. वरील क्र. (१) प्रमाणेच त्यांच्यावर संशय यावा व घरी भांडण व्हावे या उद्देशानेच हेही कृत्य केलेले होते हे उघड होते. हे कुणी केले हे क्र. (१) प्रमाणेच गूढ राहिले.

(३) मल्लाप्पाची बहीण विजया ज्या ज्या वेळी दिवाळीसाठी माहेरी (मल्लाप्पाच्या घरी आली त्या त्या वेळी तिचे घरून (सासरहून) आणलेले जुने व माहेरच्या लोकांनी घेतलेले नवे कपडे (साड्या इ.) तिच्या बास्केटमधून गेले आहेत. विजयाला घरच्या कुणाचाही विमलचाही संशय नाही असे ती म्हणते. हे कुणी केले हेही एक गूढच आहे. पण ते विमलचा संशय घेऊन घरी भांडण व्हावे या उद्देशाने केलेले कृत्य होते हे उघड आहे.

(४) वरील क्र. (३) मध्ये घडलेल्या घटनांपैकी दोन घटनांचा तपशील पाहता त्या घटना घडल्या तेव्हा विमल घरी नव्हती. (आपल्याबरोबरच होती) असे स्वत: विजयाय (मल्लाप्पाची बहीणच) सांगते. दुसऱ्यावेळी कपडे जातात हे माहीत असल्यामुळे विजयाने विमललाच आपले कपडे तिच्या ट्रंकेत कुलूपात ठेवायला दिले होते. घरी आल्यानंतर कुलूप घातलेल्या ट्रंकेतून कपडे गेल्याचे आढळून आले, असे विजयाच म्हणते. हे गुवही उकलले नाही. (कुलूप तसेच होते.)

(५) मल्लाप्पाच्या वडिलांची बिड्यांची बंडले अनेकदा गेली आहेत. एकदा त्यांची टॉनिकची बाटलीही नाहीशी झाली. मात्र बाटलीतील टॉनिक मल्लाप्पाची बहीण विजया जेथे बसली होती तेथेच सांडले होते । ते तेथे ती बसण्यापूर्वी सांडले नव्हते; बसल्यानंतरही तिच्याजवळ कोणी आले नव्हते. म्हणून हे टॉनिक येथे कुणी सांडले याचे तिला आश्चर्य वाटले. हे प्रथम तिनेच पाहिले. वडील घरी आल्यानंतर टॉनिक सांडल्याबद्दल घरच्या लोकांवर रागावले. आम्ही सांडलेले नाही असे घरच्या सर्वांनी सांगितले तरी ते त्यांना पटले नाही. मोकळी बाटली नंतर घरातच सापडली. टॉनिक कुणी सांडले याचे असले तरी घरच्या लोकांनी ते सांडले नसावे याला अप्रत्यक्ष पुरावा पुढील घटनाक्रमांकात मिळतो.

(६) एकदा मल्लाप्पाच्या वडिलांनी टॉनिकची बाटली स्वतःखरेदी करून आणली व पिशवी घरातील खुंटीला लटकावून तेथेच बसले. काही वेळाने मल्लाप्पाला त्या पिशवीतून काहीतरी थेंबथेंब ठिबकत असल्याचे दिसले. म्हणून त्याने पिशवी काढून पाहिली. तो टॉनिकची बाटली फुटून तिचे दोन भाग झाले होते. व टॉनिक सांडले होते. आश्चर्य म्हणजे थोड्याच वेळापूर्वी त्याच्या वडिलांनी त्या बाटलीतील थोडे टॉनिक घेऊन ती बाटली पुन्हा पिशवीत घालून ठेवली होती. पिशवीतील बिडी बंडलही नाहीसे झाले होते. या प्रकारामुळे क्र. (५) मधील प्रकारसुद्धा घरच्या कुणाचा नव्हता का म्हणण्याला पुष्टी मिळते. पण हे कुणाचे कृत्य हे गूढच राहिले आहे.

(७) एकदा विमल माहेरी गेली असता तिच्या ट्रंकेचे कुलूप कोणीतरी चेचलेले तिला परत आल्यानंतर आढळले. वरचेवर कपडे जात असल्यामुळे तिने जाण्यापूर्वी ट्रकेतील सर्व वस्तू घरच्या लोकांना दाखवल्या होत्या. तेव्हा तिच्या अनुपस्थितीत

तिची ट्रंक उघडून पाहण्याचे घरच्या लोकांना काहीच प्रयोजन नव्हते. कपडे मात्र गेले नव्हते. पण हा कुलूप वेचण्याचा प्रकार घरी भांडण लावण्याच्या हेतूनेच केला होता हे उघड आहे. हे कुणी केले हेही गूढ राहिले आहे.

(८) परवा सात सप्टेंबर रोजी विमल व तिचा नवरा विमलच्या माहेरगावी गेली होती. परत आल्यानंतर तिच्या ड्रंकेचे कुलूप नाहीसे झाले होते. शिवाय ट्रंकेतील तिच्या तीन साड्या, परकर इ. कपडेही नाहीसे झाले होते. नंतर हे सर्व कपडे मल्लाप्पाच्या वडिलांना घरातील पाण्याच्या (नादुरुस्त झालेल्या व इतर धान्य इ. वस्तू ठेवण्यासाठी वापरत असलेल्या) पत्र्याच्या हौदाखाली सापडले. ते तेथे कुणी व कसे ठेवले हे एक गूढच आहे. (हौद व जमीन यांच्यात थोडी फट असून जवळ झोपले असता तिकडे सहज लक्ष गेल्यामुळे वडिलांना ते दिसले.) पण मल्लाप्पाला आईवडिलांचा व विमलला सासूसासऱ्यांचा संशय यावा व भांडण व्हावे या उद्देशानेच केलेले हे कृत्य होते हे उघड आहे. गंमत अशी, की नंतर विमलच्या सासूला विमलच्या ट्रंकेचे नाहीसे झालेले कुलूप आपल्या अंथरूणातच सापडले !

(९) एकदा विमलची (पायाच्या बोटात घालतात ती) चार जोडवी गेली. तीन जोडवी कधीच सापडली नाहीत. पण एक जोडवे मात्र विमल माहेरी गेली असता मल्लाप्पाला आपल्या (नेहमी कुलूप असलेल्या) कपाटातच सापडले. यापूर्वी कपाटात ते जोडवे शोधले होते, तेव्हा ते तेथे नव्हते. पण विमल माहेरी गेल्यावर कपाटाला वरच्या बाजूला असलेल्या फटीतून कुणीतरी ते टाकले असावे असे वाटावे अशा रीतीने ते कपाटात पडले होते. मल्लाप्पाच्या आईवडिलांनी "से कपाटात सापडल्याचे विमलला सांगू नकोस. ननेच केले असे सांग व तेच पॉलिश करून तिला दे." असा मल्लाप्पाला सल्ला दिला. कारण ती सासरच्या लोकांचा संशय घेईल अशी त्यांना भीती होती. पण मल्लाप्पाने तिला खरे तेच सांगितले. सुदैवाने भांडण झाले नाही. दुसऱ्या वेळी सोन्याची अंगठी नाहीशी झाली. आणि तोही नंतर मल्लाप्पाला अशाच प्रकारे आपल्या कपाटात सापडली. या दोन्ही प्रकारात भांडण लावण्याचाच हेतू स्पष्ट दिसतो.

(१०) एकदा सासूच्या कुलूप घातलेल्या ट्रंकेतील वस्तू सुनेच्या- विमलच्या कुलूप घातलेल्या ट्रकेत सापडली. व विमलच्या कुलूप घातलेल्या ट्रंकेतील वस्तू

सासूच्या कुलूप घातलेल्या ट्रंकेत आढळली ! आपापल्या ट्रंकांच्या कुलूपांच्या किल्ल्या सासवासुनांनी आपापल्या मंगळसूत्राला कायमच्या बांधून टाकलेल्या असल्यामुळे यामध्ये किल्लीविषयी निष्काळजीपणाचा आरोप आहे. त्यांच्यावर करता येत नाही. तेव्हा हे कसे घडले याचे सर्वांनाच गूढ पडले

(११) एकदा संक्रांतीच्या दिवशी मल्लाप्पाचा मावसभाऊ नरसोबाच्या वाडीला जात असताना मल्लाप्पाच्या घरी आला होता. जाण्यापूर्वी त्याने आपली पैंट मल्लाप्पाच्या वरातील शिलाई यंत्रावर दुरुस्त करून घेतली व तो निघून गेला. तो गेल्यानंतर लगेच मल्लाप्पाची बहीण विजया व बायको विमल या दोघी गावात तिळगुळ देण्यासाठी घराला कुलूप घालून बाहेर पडल्या. परंतु येऊन विजयाने पाहिले, तो यंत्राचा शिलाईकडचा भाग पूर्ण चेपलेला तिला आढळला. इतका की ते यंत्र शिलाईच्या कामातून पूर्ण गेले होते. हे त्या मावसभावाचेच काम असावे असा तिला संशय आला. ही गोष्ट त्याला जेव्हा कळली तेव्हा आपल्यावर निष्कारण त्यांनी आळ घेतला म्हणून परत मल्लाप्पाच्या घरी आजतागायत तो आलेला नाही. यातही भांडण लावण्याचा, वितुष्ट आणण्याचा हेतू स्पष्ट दिसतो.

(१२) मल्लाप्पाच्या आईवडिलांनी पैसे व दागिने ठेवण्याचे एक सुरक्षित ठिकाण घरी केले आहे. ते ठिकाण इतके गुप्त ठेवले आहे, की ते त्यांच्याशिवाय कुणालाच मुलग्याला व सुनेलाही माहीत नाही. तेथून - माणसाखेरीज व तेही माहीत झाल्याखेरीज वस्तू नाहीशी होणे उंदीर इ. प्राण्याकडून पळवली जाणे अशक्य आहे. (कुलुपात ठेवले तर डुप्लिकेट - किल्ली वापरून चोरणे शक्य असल्यामुळे ही योजना त्यांनी केली आहे.) अशा ठिकाणाहून एकदा चारशे रुपये नाहीसे झाले आहेत. (त्यातही नोटाच नाहीशा झाल्या आहेत. बंदे रुपये जसेच्या तसे आहेत.) ते नाहीसे झाल्यामुळेव मल्लाप्पाला व प्रस्तुत लेखकाला त्यांनी ती योजना व ठिकाण दाखवले. या प्रकाराचेही गूढ उकललेले नाही.

(१३) वर उल्लेख केलेल्या सुरक्षित ठिकाणाहून दुसऱ्यांदा सोन्याची 'बोरमाळ' नाहीशी झाली. मात्र त्यातील सात मणी छपराजवळच्या भिंतीच्या भेगेत चेचलेल्या अवस्थेत आढळले ।

(१४) एकदा विमलच्या गळ्यातील मंगळसूत्र तुटलेले तिच्या सासूला दिसले. (विमलला त्याची खबर नव्हती.) म्हणून तिने ते का तुटले ते पाहिले, तो त्यातले दोन मणी नाहीसे झालेले होते. त्यापैकी एक मणी विमलता नंतर वरून समोरच चेचलेल्या अवस्थेत पडलेला (पडताना दिसला. वरून कुठून पडला याचे आश्चर्य वाटून दुसरा मणी सापडतो का पाहावे म्हणून मल्लाप्पाने छपराजवळ बारकाईने पाहिले. तेव्हा क्र. (१३) मध्ये उल्लेखिलेल्या पूर्वी नाहीसे झालेल्या बोरमाळेचे सात मणी चेचलेल्या अवस्थेत सापडले !

(१५) याशिवाय घरातील टी.व्ही. ची बटणे नाहीशी होणे, नंतर घराबाहेर चेचलेल्या अवस्थेत सापडणे, मोटरसायकलचे पार्टस नाहीसे होणे, पेट्रोलच्या टाकीत पाणी आढळणे, चपला नाहीशा होणे किंवा तुटलेल्या व उपसलेल्या आढळणे, ज्या वस्तू बरोबर नेल्या नाहीत तर मल्लाप्पाला गिरणीत कामावर घेत नाहीत, अशा वस्तू उदा. हजेरीकार्ड, नॉटर, शिक्का इ. घरातून नाहीशा होणे, ड्रंकेत कुलूपात ठेवलेले कपडे नाहीसे होणे, ठेवलेल्या ठिकाणी जळलेले आढळणे, अंगावरच कपडे जळणे, ठेवलेल्या ठिकणी कपडे पेटणे, विझवल्यानंतर काही वेळाने पुन्हा पेटणे, जळलेले तेच कपडे पुन्हापुन्हा पेटणे असे प्रकार झाले आहेत. हे प्रकार विमलनेच केले असणे शक्य आहे असे ज्यांना वाटते, त्यांना पुढील प्रकार विमलने कसे केले हे सांगावे लागेल.

(१६) एकदा विमल स्वयंपाक करीत असता माजघरातील पाळण्यात झोपलेले मूल धडपडत असलेले पाहून तिच्या सासूला ती त्याला घ्यावयास गेली असता पाळण्यावरील टॉवेल जळलेले आढळले. ते बाजूला सारून मूल उचलताच मुलाच्या अंगावरचा फ्रॉक पाठीमागच्या बाजूला संपूर्ण जळलेला आढळला. खालचे अंथरूणही थोडे जळलेले होते. (हे प्रस्तुत लेखकाने पाहिले आहे.) पण मुलाच्या पाठीला कसलीही इजा झाली नव्हती. मुलाला पाळण्यात झोपवण्यापूर्वी असे काहीच जळलेले नव्हते याची खात्री सासूला आहे. मुलाला झोपवल्यानंतरच हे घडलेले असून हे एकदीड तासातच घडलेले आहे व या अवधीत सासू घरीच होती. व विमल स्वयंपाक करीत होती. म्हणूनच तिला याचे आश्चर्य वाटते. हे कसे घडून आले?

पाळण्यात मूल असतानाच हे घडलेले असेल तर मुलाला इजा कशी झाली नाही? हे एक मोठेच गूढ आहे.

(१७) ज्या प्रकारामुळे हेरवाडचे हे प्रकरण वृत्तपत्रात प्रसिद्ध झाले तो प्रकार विमलचे माहेर बेडकीहाळ (ता. चिक्कोडी, जि. बेळगाव) या गावी घडल्यामुळे ते झाले असले तरी तो प्रकार प्रथम तिच्या सासरी घडू लागल्यामुळेच ती माहेरी गेली होती असे सांगण्यात आले आहे. हा प्रकारही प्रथम विमलच्या सासूनेच पाहिला. क्र. (१६) प्रमाणेच विमल स्वयंपाक करीत असताना पाळण्यात निजवलेले मूल एकदम रडू लागल्यामुळे सासू ते घेण्यासाठी गेली असता मूल नागडे आढळले. झोपण्यापूर्वी मुलाच्या अंगावर कपडा घातला होता. हा कपडा नाहीसा झालेला सासूला आढळला. नंतर तो मुलाच्या मांडीला बांधलेला आढळला ! हा प्रकार अनेकवेळा झाला. प्रत्येकवेळी 'अदृश्य' झालेला तोच कपडा पुन्हा आढळला. (एकदा तर मल्लाप्पाच्या घरी राहायला आलेल्या त्याच्या ८ वर्षे वयाच्या भाच्याच्या अंथरुणाखाली तो सापडला.) माहेरीही तीन-चार वेळा मुलाच्या अंगावरील कपडे नाहीसे झाले. पण फक्त दोन वेळा परत आले. एकदा ते मुलाच्या पायाला बांधलेले व दुस-यांदा पाळण्याला बांधलेले आढळल्याचे सांगण्यात आले आहे. कापड जाण्यापूर्वी मूल एकदम किंचाळते वा रडते आणि म्हणून तिकडे इतरांचे लक्ष जाते आणि त्याला घ्यायला गेले की ते नागडे आढळते असे सांगण्यात आले आहे.

(१८) एकदा सासरी सर्वजण जेवत असता विमलच्या सासूने पाणी घेण्यासाठी पिंप उघडले, तो पाण्यात तिला विष्टा आढळली. याच्या थोड्या वेळापूर्वी तिने त्यातलेच पाणी घेतले होते, त्यावेळी ती नव्हती. अशा प्रकारे एकदा भाकरीवर व एकदा चहापावडर ठेवण्याच्या स्टीलच्या डब्द्यातही (पावडरीत) विष्टा आढळली आहे. एकदा घडी घातलेल्या चादरीतही ती आढळली आहे.

(१९) विमलच्या तोंडावर, पोटावर, व जिभेवर काळे डाग उमटत असत, नंतर त्याची जखम बनून त्यातून पू, पाणी गळत असे. याचे निदान डॉक्टर लोकांना करता आलेले नाही. काहीजण हा बिब्याचा परिणाम असावा असा संशय व्यक्त करीत. (पण घरी बिब्बा नसतानाही ते वरचेवर उठत असत.) तर काहींनी तो त्वचारोग आहे, असे निदान केले.

(२०) हा काही वेगळा प्रकार आहे असे वाटून विमलच्या सासूने तिला एका देवऋषीकडे एकदा नेले. बसमध्ये बसल्यानंतर विमलच्या कपाळावर भस्माचे तीन पट्टे आडवे ओढावे तसे तीन काळे पट्टे उमटू लागले. देवर्षीच्या घरी जाईपर्यंत ते इतके ठळक झाले, की बसमधील जो तो हा काय प्रकार, म्हणून विचारू लागला. आश्चर्य असे, की थोड्या वेळाने काही न करता ते आपोआप नाहीसे झाले.

(२१) विमलच्या साड्यांनाही धुवून न जाणारे काळे डाग उमटत. सासूने विमलला उपर्युक्त देवर्षीकडे नेत असता रस्त्यातच ते आपोआप नाहीसे होत. त्याच्या घरी पोचेपर्यंत पूर्वीप्रमाणे साडी स्वच्छ होत असे.

(२२) विमलच्या हाताचे तळवेही काळे होत. ते स्वच्छ करण्यासाठी रॉकेल व साबण लावावे लागे. जमीन शेणाने सारवताना (ही घरात फरशी बसवण्यापूर्वीची गोष्ट आहे.) जमिनीवर हाताच्या बोटांचे काळे डाग उमटत. हे डाग प्रथम स्पष्ट व नंतर कमी असे उमटत नसत, तर ते सारवेपर्यंत सतत स्पष्ट उमटत असत हे त्यांचे वैशिष्ट्य होते.

(२३) घरात खुंटीला लटकवलेली मल्लाप्पाची पांढरी पँट एकदा एका रात्रीत पूर्ण काळी झालेली सकाळी आढळून आली. तो काळेपणा धुवूनही न जाणारा असतानाही उपर्युक्त देवर्षीचा अंगारा लावला की लावलेला भाग पूर्वषत लगेच शुभ होत असे, असे सांगण्यात आले.

(२४) घरातील प्लॅस्टिकच्या बालदीलाही कशानेही धुवून न जाणारे काळे डाग एका रात्रीत पडले आहेत. असे डाग एका रात्रीत पडू शकतात का ?

(२५) घरच्या गाईची स्तनेही काळी झाली आहेत. गायीची कास (आचळ) मात्र लालसर-पांढरीच आहे. हा काळेपणा त्यांना काही दिवसातच आला आहे. (हा फरक एका आठवड्यात पडल्याचे प्रस्तुत लेखकाला आढळून आले आहे.)
पशुवैद्यकशास्त्राच्या दृष्टीने हे असे होऊ शकते काय ? होत असल्यास कशाने होते ?

(२६) विमल माहेरी बाळंत होऊन आल्यानंतर दोन-तीन लिटर दूध देणाऱ्या घरच्या म्हशीने एकदम विमल घरी आलेल्या दिवशी दूध देणेच बंद केले. अशा रीतीने

म्हशीचे दूध बंद झाल्यामुळे ६००० रु. किंमतीची ती म्हैस मल्लाप्पाने गावातच एकाला केवळ ७०० रुपयाला विकली. विकत घेतलेल्या माणसाच्या घरी मात्र ती पुन्हा दूध देऊ लागली ! हा प्रकार एका महिन्यात घडून आला आहे.

(२७) मल्लाप्पा स्वतःकसत असलेल्या शेतात भरपूर खत-पाणी वापरूनही चांगले पीक येत नाही. त्याने जमिनीवर कर्ज काढून आपली लगतचीच जी जमीन दुसऱ्याला दिली आहे, त्या जमिनीत मात्र त्याच्यापेक्षा जास्त खत पाणी न वापरताही चांगले पीक येते (हल्ली हे कोणीही पाहू शकतो.)

(२८) पूर्वी एक ज्वारीचे पोते मल्लाप्पाच्या कुटुंबाला पाच-सहा महिने पुरत होते. लग्न झाल्यानंतर माणसे तितकीच असून (बहिणीच्या जागी बायको आली.) एक पोते दोन महिनेही पुरत नाही असे त्याची आई म्हणते.

(२९) विमलच्या सात गर्भापैकी दुसरा व शेवटचा गर्भ योग्य रीतीने कावून निरोगी मुली जन्मल्या. बाकीचे गर्भ दर १५ दिवसांनी सोनोग्राफीने तपासून ते योग्यरीतीने वाढत असल्याची खात्री डॉक्टरनी केलेली असतानाही एकतर विकृती निर्माण होऊन विकृत वा मेलेले मूल जन्मले वा गर्भपात करावा लागला वा झाला. ज्या स्वीरोगतज्ज्ञ डॉक्टरनी विमलची तपासणी केली त्यांनी (मी त्यांचे वैद्यकीय रेकॉर्ड तपासण्यासाठी गेलो असता) रेकॉर्ड न पाहताच माहिती सांगितली. केवळ नाव सांगताच हे त्यांनी हजारो पेशंटमध्ये कसे लक्षात ठेवले याचेच आश्चर्य वाटून याबद्दल विचारता 'ही केस अगदी विरळ (rare) आहे' असे ते म्हणाले. याचा अर्थ, हा प्रकार वैद्यकशास्त्रालाही कोडे आहे असा होता. ज्या दुसऱ्या एका डॉक्टरनी विमलची तपासणी केली होती त्यांचेही असेच मत पडले. वैद्यकशास्त्र सर्वच गोष्टींची उपपत्ती देऊ शकत नाही हे त्यांनी प्रांजळपणे मान्य केले.

(३०) वर (२९) मध्ये दुसरा व शेवटचा गर्भ पूर्ण वाढून दोन निरोगी मुली जन्मल्या असे जे म्हटले, त्यावेळच्या गर्भारपणात कसा दोष निर्माण झाला नाही याचे आश्चर्य वाटून संशोधन केले असता असे आढळून आले, की या दोन गर्भारपणात डॉक्टर लोकांचा सल्ला (उदा. ओझे उचलायचे नाही, जड़ कामे करायची नाहीत इ.) झुगारून सासूने त्याविरुद्ध सर्व जड कामे सुनेला करायला लावली. (इतर गर्भारपणी

मात्र अंघोळीची बादलीसुद्धा सासू सुनेला स्वतःउचलून देत होती.) मात्र 'नदीच्या देवाची पूजा दर अमावस्येला वा पौर्णिमेला न चुकता करीत होती. हा योगायोग म्हणा, काही म्हणा, अमावस्येला ज्या गरोदरपणी नदीची पूजा केली होती, त्या गरोदरपणी मुलगी अमावस्येला जन्मली व ज्या गरोदरपणी पौर्णिमला नदीची पूजा केली होती, त्या गरोदरपणी पौर्णिमेला मुलगी जन्मली. या दोन्ही मुली इतक्या निरोगी व भ्रष्टपुष्ट आहेत की ती अशक्त विमलचीच आहेत यावर कोणाचा विश्वासही बसणार नाही.

(३१) वर उल्लेख केलेल्या सर्व क्र. (१) ते (२९) घटनांचे गूढ उकलता आले नाही किंवा त्यापैकी काहींची प्राकृतिक उपपत्ती देता आली नाही, तरी ते सर्व प्रकार 'भानामती'मुळेच घडले असे सिद्ध होत नाही असे म्हणता येते. पण असे केव्हा म्हणता येते? जेव्हा या सर्व घटनाप्रकारांचा अन्योन्य संबंध नाही हे सिद्ध करता येते तेव्हा. हे सिद्ध करता येते का? हे सिद्ध करण्याची एक शास्त्रीय पद्धत म्हणजे अशा प्रकारच्या विलक्षण घटना एखाद्या कुटुंबात विशिष्ट अवधीत स्वाभाविकपणे घडण्याची संभवनीयता किती आहे याचे संभवशास्त्राच्या (theory of probability) आधारे मोजमाप करणे, (calculating the odds against the coincidence of paranormal events occurring naturally in a particular family over a specified time period.) आणि ती संभवनीयता प्रचंड असल्याची दाखवून देणे. पण हे प्रकार एखाद्या कुटुंबात सलग घडून येत असल्यामुळे (temporally contiguous) ते स्वाभाविकपणे घडून येण्याची संभवनीयता जवळजवळ शून्य आहे. ही यातील अडचण आहे. म्हणून माझे समितीला पुढील प्रश्न आहेत.

(१) सासरी असताना जेथे विमल उपस्थित होती, तेथे घडलेले घटना प्रकार तिनेच केले हे समितीला साधार सिद्ध करता येईल काय ?

(२) ज्यावेळी सासरी एखादी घटनाप्रकार घडला त्यावेळी ती तेथे नसल्याचे सासरचे लोक जेथे खात्रीपूर्वक सांगतात, त्या ठिकाणी तो घटनाप्रकार कुणी केला हे समिती साधार सांगू शकेल काय?

(३) विमल माहेरी असताना सासरी घडलेले घटनाप्रकार कुणी केले हे समिती सांगू शकेल काय ?

(४) विमल माहेरी असताना माहेरी घडलेले घटनाप्रकार कुणी केले हे समिती सांगू शकेल काय ?

(५) वरील सर्व प्रकार कुणी केले हे सांगता आले नाही, तरी ते सर्व मनुष्यकृत आहेत असे गृहीत धरले तर ते करण्यापाठीमागचा हेतू समितीला बुद्धीला पटेल अशा रीतीने सांगता येईल काय ?

(६) वर ज्या गूढ घटनांचा उल्लेख केला आहे त्या घटनांचे गूढ समितीला उकलता येईल काय? यांची तर्कशुद्ध प्राकृतिक उपपत्ती देता येईल काय?

(७) सासरच्या लोकांना विमलचा संशय जरासुद्धा का येत नाही, याचे कारण समितीला सांगता येईल काय ?

(८) ज्या घटनांची प्राकृतिक उपपत्ती देता आलेली नाही अशा क्र. (१९) ते क्र (३०) पर्यंतच्या घटनाप्रकारांची प्राकृतिक उपपत्ती समितीला देता येईल काय ?

(९) आता काही काल्पनिक (hypothetical) प्रश्न- अशी कल्पना करू की जे मनुष्य करणे शक्य आहे असे घटनाप्रकार विमलनेच केले; आणि ते तिला नवऱ्याकडे नांदावयाचे नाही म्हणून केले.

(अ) या हेतूने सतत सात वर्षे एखादी स्त्री हे प्रकार करणे शक्य आहे काय?

(आ) सात वर्षे हे प्रकार करूनही तो हेतू साध्य होत नाही हे दिसून आल्यावर तिने ते बंद करावयास नको होते काय? एकदोन वर्षातच त्यांचे वैयर्थ्य कुणालाही पटले नसते काय?

(इ) या प्रकारामुळे मल्लाप्पाला ५३ हजार रुपयांचे कर्ज झाले असून (एक एकर जमीन गहाणवट टाकावी लागली आहे.) त्याची आर्थिक परिस्थिती अतिशय बिघडली आहे. याची झळ स्वतःविमलला बसत आहे. अशा परिस्थितीत ती हे प्रकार करून स्वतःचे नुकसान व हाल का करून घेत आहे ?

(ई) सासरी नांदावयाची इच्छा नाही म्हणून तिने हे प्रकार केले

असतील, तर ते माहेये करण्याचे कारण काय? माहेरच्या लोकांना हा भानामतीचा प्रकार आहे हे पटवून देण्यासाठी तिने हे 'नाटक' केले म्हणावे तर हे 'नाटक' करण्यापूर्वीच सासरच्या लोकांनी एका मांत्रिकाकडे तिला नेले होते; व त्याने अंगात भरवलेल्या पिशाच्चाने 'मी जातो' म्हटल्याचे माहेरच्या लोकांनीच लेखकाला सांगितले असल्याने त्यांची खात्री पटवण्याचा प्रश्नच उपस्थित होत नाही. तसेच सासरच्या लोकांनाही हा प्रकार आपण मुद्दाम करत नाही हे दाखवून देण्यासाठी हा प्रकार माहेरी करण्याचे कारण नाही. कारण तिच्यावर सासरचा कसलाच आरोप नाही.

(ड) दोन मुले झालेली बाई नवऱ्याकडे नांदण्यास नाखूश असण्यासारखे काहीतरी जबरदस्त कारण असले पाहिजे. सासरमाहेरच्या लोकांना या सात वर्षात ते सापडलेले नाही. समितीला ते सापडले आहे काय ?

(१०) या विश्वात अतिप्राकृतिक काही घडत नाही, सर्व घटना प्राकृतिकच असतात, हे गृहीतकृत्य समितीने कशाच्या आधारे स्वीकारले आहे? अमेरिकेच्या 'अमेरिकन असोसिएशन फॉर द ॲडव्हान्समेंट ऑफ सायन्स' या राष्ट्रीय विज्ञान संघाने भानामतीसारख्या अतिप्राकृतिक घटना सत्य असल्याचे मानणाऱ्या परामानसशास्त्र या शाखेला आपल्या संघाला संलग्न (affiliate) करून घेऊन मान्यता दिली आहे. तेव्हा जे अमेरिकेच्या AAAS सारख्या मातब्बर विज्ञान संघाला मान्य आहे, ते महाराष्ट्रातील आपल्या समितीला मान्य नसेल तर ते का मान्य नाही हे वैज्ञानिक कसोट्यांच्या आधारे ती ते दाखवून देईपर्यंत आपली समिती विज्ञानविरोधी आहे असे का मानू नये ?

(११) आपल्या समितीच्या लोकांनी मल्लाप्पाच्या कुटुंबातील एकेक व्यक्तीला एका वेगळ्या खोलीत बोलावून तिच्याकडून आपणाला पाहिजे ते वदवून घेण्यासाठी धाकदपटशा दाखवण्याचे, तिरकस प्रश्न विचारण्याचे पोलिसी तंत्र अवलंबले. (एका खोलीत एकटी असहाय्य व्यक्ती व भोवती शत्रुवत वागणाऱ्या लोकांचा गराडा ही परिस्थितीच त्या व्यक्तीला घाबरे करणारी होती.) आपल्याबरोबर आणलेल्या दोन सामान्य मुली 'स्त्री पोलिस' असल्याचे खोटेच सांगून विमलला पोलिस ठाण्यात

नेण्यात येईल, तेथे मारझोड होईल, नंतर कबूल झालीस तर काही उपयोग होणार नाही, म्हणून आताच हे सर्व तू केल्याचे कबूल कर अशी धमकी घातली, मल्लाप्पाला विमलचे चारित्र्य वाईट असल्याचे सूचित करणारे, तिच्या चारित्र्याविषयी त्याच्या मनात संशय निर्माण व्हावा अशा प्रकारचे हीन अभिरुचीचे प्रश्न मुद्दाम विचारले, खोटे बोललेले शोधून काढणारे यंत्र आणले आहे असे भासविण्यासाठी लबाडी केली; या कोणत्याही तंत्राला मल्लाप्पाचे कुटुंबीय न दबल्यामुळे 'तुम्ही सर्वांनी एकच गोष्ट सांगण्याचा पूर्वनियोजित कट केला आहे काय?" असा आरोपही आपले अपयश झाकण्यासाठी केला. पुन्हा भानामती झाली, तर ते नोंद करणारे यंत्र तुमच्या मागच्या खोपीत गुप्त ठिकाणी ठेवले आहे अशी शेवटी भीतीही घातली. 'आता आम्ही भानामती बंद केली आहे. ती आता पुन्हा होणार नाही असे मल्लाप्पाला शेवटी ठामपणे सांगितले. समितीने एवढे सर्व केल्यानंतरही कपडे नाहीसे होणे, ते जळणे, अन्नात व पाण्यात विष्ठा पडणे यासारखे अनेक प्रकार घडले आहेत. ते पुन्हा घडले असल्याने मल्लाप्पाच्या कुटुंबियांवर त्यांनी हा सर्व बनाव किंवा कट केल्याचा आरोप करून मोकळे होणे, (उदा. आपल्या जवळ मूल असताना एकदा मुलाच्या अंगावरचे कापड गेले आहे' असे समितीच्या लोकांना जेव्हा सांगितले तेव्हा 'त्याने मुलाचे कापड काढून खिशात घातले व गेल्याचे नाटक केले' असा त्याच्यावर त्यांनी बिनबुडाचा आरोप केला आहे.) व ते घडले नसते तर 'आम्ही भानामती बंद केली' अशी फुशारकी मार हे दोन्ही पर्याय समितीच्या ध्येयधोरणाशी सुसंगत असले तरी ते वैज्ञानिक वृत्तीशी सुसंगत नाहीत. कोणताही आरोप करण्यापूर्वी घटनांचे तटस्थपणे निरीक्षण व तपासणी करणे व मगच एखादा निष्कर्ष काढणे हे विज्ञानवृत्तीच्या माणसाला शोभणारे आहे. पण असे करण्याऐवजी आपले निष्कर्ष न सांगणे व आरोप मात्र करणे असला प्रकार समितीच्या लोकांनी केला आहे. 'आम्ही आमचा निष्कर्ष सांगत नाही. कारण तो सांगितला तर कुटुंबातील संबंध बिघडतात,' असा एक समितीच्या लोकांचा पळवाट काढणारा युक्तिवाद आहे. ही पळवाट नसेल व हा युक्तिवाद प्रामाणिक हेतूने केलेला असेल तर संबंधित कुटुंबीयांची हे कुणी व का केले हे सांगण्यास हरकत नसेल तर ते सांगण्यास आढेवेढे घेण्याचे समितीला काहीच कारण उरत नाही, म्हणून नाव व कारण सांगून ते पटवून देण्याची विनंती करणारे मल्लाप्पाचे विनंती व हमीपत्र भी या माझ्या पत्रासोबत जोडले आहे. हे विनंती व

हमीपत्र देऊनही आपल्या समितीने ते सांगण्यास टाळाटाळ केली तर या प्रकाराची 'मनुष्यकृत' व 'प्राकृतिक' हे दोन समितीचे आवडते सिद्धांत समितीला सिद्ध करता आलेले नाहीत असा निष्कर्ष का काढू नये?

(१२) 'भानामती आमच्यासमोर का घडत नाही, ती घडत नसल्यामुळे ती खोटी' असे आपल्या समितीचे म्हणणे आहे. 'आमच्यासमोर ती का घडत नाही?" हा समितीचा प्रश्न 'काल संध्याकाळी दवाचे थेंब गवताच्या पानांवर नव्हते, सकाळी ते कुंठून आले? (माझ्यासमक्ष का आले नाहीत ?) असे आईला विचारणाऱ्या बालकवींच्या कवितेतील 'बाळ्या'च्या प्रश्नाप्रमाणे बालिश आहे. विज्ञानवृत्तीच्या माणसाला न शोभणारा आहे. 'तू समोर का घडत नाहीस?' असे त्या भानामतीलाच विचार, असे यावर समितीला त्याच पद्धतीने मल्लाप्पाला उत्तर देता येईल. दुसऱ्या शब्दात ती समोर का घडत नाही हे समितीने शोधून काढले पाहिजे. निसर्गातील सर्वच घटना समोर घडत नाहीत; अनेक घटना त्या घडल्यानंतरच, त्यांची लक्षणे शरीरात दिसल्यानंतरच कळतात. ते रोग होण्यापूर्वी ते कसे होतात हे कळत नसेल तर ते शोधून काढणे हे जसे वैद्यकशास्त्राचे काम आहे, तसे भानामती ही सुद्धा रोगाप्रमाणे निसर्गातील एक विकृती आहे असे मानून त्याची कारणपरंपरा शोधणे हे विज्ञानवृत्ती बाळगणाऱ्यांचे कर्तव्य आहे. ती बुवाबाजीप्रमाणे कोणत्यातरी स्वार्थी हेतूने केली जात असली पाहिजे हे उघड आहे. तो स्वार्थी हेतू शोधून काढून तो समितीने उघड करून दाखवला पाहिजे. तसे काही न करता कसलाही आधार नसताना मल्लाप्पावर आरोप करणे व पुरावा नसताना विमलच्या चारित्र्यावर शिंतोडे उडवणे, म्हणजे प्रतिपक्षाच्या लोकांवर राजकीय हेतूने खोटेनाटे आरोप करणाऱ्या व त्यांचे चारित्र्यहनन करणाऱ्या राजकारणी लोकांची खेळी खेळणे होय. म्हणून माझा समितीला शेवटचा प्रश्न आहे, की एखादी व्यक्ती गुन्हेगार आहे हे पुराव्यानिशी सिद्ध होईपर्यंत ती निष्पाप आहे असे गृहीत धरण्याची न्यायालयाची शास्त्रीय व न्याय्य पद्धत धाब्यावर बसवून ती गुन्हेगार असल्याचे अगोदरच गृहीत धरणे, त्यासाठी मारझोड करण्याची भीती घालून पोलिसी पद्धत वापरणे, पुरावा नसतानाही चारित्र्यहननाचा मार्ग अवलंबणे, विनाआधार आरोप करणे, आपणाला हवे ते वदवून घेण्यासाठी खोटेपणा करणे **या समितीच्या कार्यपद्धतीवरून समितीचा मूळ हेतू**

**वैज्ञानिक संशोधन करणे हा नसून, विशिष्ट राजकीय (नास्तिक आणि धर्मविरोधी) विचार प्रणालीचा राजकीय पद्धतीने प्रचार आणि प्रसार करण्याचा आहे, असे का मानू नये?** विज्ञानाच्या वाघाचे कातडे पांघरून स्वतच्रा स्वार्थ साधण्याची ही धूर्त कोल्ह्याची नीती नव्हे काय ?

मल्लाप्पाने १९९१ साली सतत सात वर्षे घडत असलेल्या या भानामतीची माहिती देणारे व ती बंद करण्याची विनंती करणारे पत्र आपल्या समितीच्या लोकांना प्रत्यक्ष हातात देऊनसुद्धा त्यांनी त्याची दखल घेतली नाही. (त्या पत्राची मूळ प्रत त्याच्याकडे आहे.) या वर्षी ऑगस्टमध्ये त्याच्या नायकोच्या माहेरी हे प्रकार घडल्यामुळे तेथील दोन वार्ताहरांनी याविषयीची वृत्तपत्रात बातमी देऊन '**हे अंधश्रद्धा निर्मूलन समितीला आव्हान आहे**' असे म्हटल्यामुळे शेवटी आपल्या समितीला त्याची दखल घेणे भाग पडले. या घटनांची तपासणी करून हे प्रकार आता आम्ही बंद केले आहेत असे मल्लाप्पाला ठामपणे समितीने सांगितले आहे. ज्याला या प्रकारांचे निदान झालेले नाही, तो असे विधान छातीठोकपणे कधीच करणार नाही. आपली समिती असे विधान छातीठोकपणे करते याचा अर्थ समितीला या भानामतीची कारणमीमांसा पूर्णपणे कळली आहे असा होतो. म्हणजे माझ्या वरील सर्व प्रश्नांची उत्तरे आपल्या समितीकडे तयारच आहेत असा होतो. म्हणून हे पत्र पोचल्यानंतर माझ्या सर्व प्रश्नांची उत्तरे रजिस्टर पोस्टाने आठ दिवसात वरील पत्त्यावर पाठवावीत अशी विनंती आहे. आपले सर्व प्रश्नांची सविस्तर व समर्पक उत्तरे देणारे पत्र या अवधीत आले नाही, तर माझे निष्कर्ष काढण्यास मी मोकळा असेन.

कळावे,

आपला,

अद्वयानंद गळतगे

**सोबत** मल्लाप्पा नेलें याचे विनंती व हमीपत्र.

**ता. क. :** (१) समितीने भानामतीची तपासणी केल्यानंतर ती काही कारणाने बंद झाली तर ती समितीनेच बंद केले असे सिद्ध होत नाही. ती कोण, कसे व का

करत होते हे शोधून काढून त्या शोधामुळे ती बंद झाल्याचे पुराव्यानिशी समितीला दाखवून देता आले तरच तिने ती बंद केली असे म्हणता येईल. असे काही न करता अज्ञात कारणाने बंद झालेली भानामती आम्ही बंद केली असे केवळ म्हणून त्याचे श्रेय समितीला वा अन्य कोणालाही उपटता येणार नाही. ज्यांना ते असे उपटायचे आहे त्यांना आपण विज्ञानवादी आहोत असा दावा करता येणार नाही.

(२) आपल्या समितीच्या जिल्हा संघटकानी आपला पत्ता न दिल्यामुळे याची प्रत त्यांना पाठवू शकलेलो नाही.

**रजिस्टर पोस्ट ए. डी.**

नाव मल्लाप्पा बसाप्पा नेर्लें

हेरवाड (ता. शिरोळ, जि. कोल्हापूर. )

आ. श्री. विजयकुमार ईश्वर शिंदे

कोल्हापूर जिल्हा संघटक, अंधश्रद्धा निर्मूलन समिती.

स. न. वि. वि.

आपण अंधश्रद्धा निर्मूलन समितीतर्फे माझ्या घरी येण्याचे कष्ट घेऊन माझा भानामतीचा त्रास नाहीसा करण्यासाठी केलेल्या प्रयत्नावरून मी आपला अतिशय आभारी आहे. आपण व आपल्या समितीच्या लोकांनी अनेकदा हा शस येथून पुढे होणार नाही असे घरी येऊन सांगितले आहे. तरी त्रास चालूच आहे. मांत्रिकसुद्धा असेच सांगतात. मग मांत्रिकात व तुमच्यात काय फरक ? मांत्रिक हा प्रकार माणसाचा नव्हे असे म्हणतात. आपण हे सारे माणसामुळेच होते असे म्हणता. माणसामुळे होत असेल, तर कोणता माणूस हे करत आहे हे आपण सांगितले पाहिजे. माझ्याकडून आपण मांत्रिकाकडे जाणार नाही असे लेखी वचन लिहून घेतले आहे. माझ्यावर हे बंधन घातल्यामुळे कोणा मांत्रिकाकडे मी जाऊ शकत नाही. मग हे प्रकार बंद होण्यासाठी कोण माणूस हे करीत आहे हे कळावयास नको काय? हे सांगण्याचे आपल्यावरही बंधन आहे आणि तेही लेखी सांगण्याचे बंधन आहे. कारण आपण माझ्याकडून लेखी लिहून घेऊन माझ्यावर बंधन घातले आहे. समजा, हे

प्रकार उद्या बंद झाले तरी ते कोण करीत होते व का करीत होते हे समजावयास नको काय? इतकेच नव्हे तर तो ते कसे करीत होता हेही कळले पाहिजे. तरच ते माणूसच करीत होता असे म्हणता येईल आणि हे आपणास मला पटवून द्यावे लागेल. तेसुद्धा सविस्तर लेखी पटवून द्यावे लागेल. कारण त्यामुळे भानामतीचा त्रास होणाऱ्या इतर अनेक लोकांना त्याचा उपयोग होणार आहे. त्यामुळे ते सावध होतील. शिवाय माझ्याकडून जसे तुम्ही लेखी घेतले आहे तसे तुम्हालाही मला लेखी द्यावे लागेल. म्हणूनच मी हे पत्र मुद्दाम लिहिले आहे. तुमचेही आमच्या घरच्या भानामतीचा उलगडा करणारे सविस्तर पत्र मला आले पाहिजे. किंवा प्रत्यक्ष मला या प्रकारावर प्रकाश टाकणारे लेखी सविस्तर विवेचन माझ्या हातात दिले पाहिजे. असे काही तुम्ही केले नाही तर मी तुमच्यात व मांत्रिकात काही फरक नाही असे समजेन व भी तुम्हाला लेखी दिलेल्या वचनातून मुक्त झालो असे समजेन व तुम्हीही असे समजावे. कळावे.

आपला,

(म. ब. नेलें)

**ता. क.** भानामतीचे विवेचन केल्यास आमच्या घराचे वातावरण बिघडेल असे आपणास वाटत असल्यास मी तसे काही होणार नाही याची हमी देतो. शेवटी त्याची जबाबदारी आमची राहील. तुम्हाला त्याबद्दल जबाबदार धरले जाणार नाही.

आपला,

(म. ब. नेलें)

प्रारंभी म्हटल्याप्रमाणे माझे पत्र स्वीकारले नाही म्हणून परत आल्यानंतर माझ्या नेलें कुटुंबाची प्रत्यक्ष भेट घेऊन माहिती मिळविण्याच्या उद्योगात खंड पडला नाही. तो उद्योग पुढे एक वर्षपर्यंत चालू होता. या अवधीत तेथे घडलेल्या घटना सांगण्यापूर्वी वरील पत्रात न उल्लेखिलेल्या काही किरकोळ घटनांचा निर्देश केला पाहिजे. त्या पुढीलप्रमाणे-

कधी घरातील कपाटाचे कुलूप अदृश्य होई, तर कधी किल्ली अदृश्य होई. काही कुलुपे व किल्ल्या नंतर घरातच कुठेतरी सापडत. एकदा स्वयंपाकघरातील कपाटाला ज्या कपाटाला कधीही कुलूप घातले जात नव्हते, कारण त्यात जेवणाचे, स्वयंपाकाचे पदार्थ ठेवलेले असत कुलूप घातलेले आढळले. आणखी - एकदा विमलच्या गळ्यातील मंगळसूत्राला बांधलेली किल्ली अदृश्य झाली. एकदा स्वयंपाकघरातील भांडी ट्रंकेत भरलेली आढळली. एकदा तर ट्रंकेत गोवऱ्या भरलेल्या आढळल्या. पिण्याच्या पाण्यात पीठ, अंघोळीच्या पाण्यात चटणी असे प्रकारही आढळून येत. विमलच्या अंथरूणात चटणी पसरलेली आढळून आली आहे. त्यामुळे तिचे अंग भगभगून रात्रभर जागरण होई. एकदा पाळण्यात मूल नसताना पाळण्याची दोरी तुटून पाळणा पडलेला आढळला. काही दिवस मांडयांना भोके पडू लागली. चुलीवर अंघोळीसाठी पाणी भरून ठेवलेला हंडा एकदा तळाला अचानक भोके पडून पाणी गळून मोकळा झालेला आढळला. अंथरूणात चटणी पडण्याचा प्रकार वरचेवर घडू लागल्यामुळे एकदा विमलच्या सासूने चटणीची बरणी कपाटात ठेवून त्याला कुलूप घातले. इतकेच नव्हे तर ती कपाटाला लागून आडवी झोपली. आश्चर्य म्हणजे त्याच रात्री पुन्हा विमलच्या अंथरूणात चटणी आढळली !

आता वरील पत्र लिहिल्यानंतर घडलेली एक महत्त्वाची घटना सांगितली पाहिजे. ही घटना म्हणजे मल्लाप्पाच्या वडिलांचा अचानक मृत्यू ! मल्लाप्पाच्या वडिलांना कसलाही रोग किंवा विकार नव्हता. केवळ अशक्तपणाची एक त्यांची तक्रार होती. पण ती केवळ काल्पनिक होती. तरुणांप्रमाणे अंगात ताकत यावी असे त्यांना वाटे! (त्यासाठीच ते सतत टॉनिक घेत असत !) घरातील भांडणे व भानामती यांना विटून गेल्यामुळे कुठेतरी लांब जाऊन राहावे असेही त्यांना सतत वाटे. एकदा प्रस्तुत लेखकाच्या गावच्या डॉक्टरांच्या ओळखीने त्यांना बेळगावच्या सिव्हिल हॉस्पिटलमध्ये काही दिवसांसाठी केवळ जागा बदल म्हणून ठेवले. तेथे ठेवल्यानंतर केवळ आठच दिवसांनी तेथील अधिकाऱ्यांची ते मयत झाल्याची तार आली. ते रुग्ण नसल्यामुळे निरोगी असल्यामुळे त्यांच्याजवळ कोणीही नव्हते. त्यांना कसला औषधोपचारही चालू नव्हता, तेथील डॉक्टर व नर्स ते कसे वारले हे सांगू शकत नव्हते. मात्र शेजारचा एक रुग्ण " 'छातीत कळा आल्या' असे ओरडून एकदम ते

पडले, ते पुन्हा उठलेच नाहीत." असे सांगतो. मात्र यापूर्वी त्यांच्या छातीत कधीच दुखल्याची तक्रार नव्हती. रक्तदाबाचा विकारही नव्हता. मधुमेह व इतर कसलाही विकार नव्हता.

ते हॉस्पिटलमध्ये वारल्यामुळे लोकांची ते कसल्यातरी आजाराने वारले अशी मात्र समजूत झाली, आणि ती मल्लाप्पाच्या पथ्यावर पडली. कारण ते घरी वारले असते तर भानामतीला ते बळी पडले, किंवा तिला कंटाळून त्यांनी आत्महत्या केली किंवा विमलने त्यांना विष घालून मारले इ. प्रवाद पसरले असते. या प्रवादातून मल्लाप्पा बचावला.

मल्लाप्पाचे वडील ५ जानेवारी १९९४ या दिवशी वारले. यानंतर दोन महिने कसलाच प्रकार घडला नाही. आपल्या वडिलांचा बळी घेऊन भानामती गेली असा त्यामुळे मल्लाप्पाचा समज झाला. पण हा समज चुकीचा ठरवणाऱ्या घटना दोन महिन्यांनी पुन्हा घडू लागल्या. एक मार्चपासून पुन्हा किरकोळ प्रकारांना सुरुवात झाली. पुन्हा कपडे अदृश्य होऊ लागले, फाटू लागले. अन्नात कुंकू आढळणे, धुण्यात काचा आढळणे, जेवणाच्या अन्नात काचेचे तुकडे आढळणे असले नवीन प्रकार सुरू झाले. धुणे धुतेवेळी काचा हातात घुसून विमलच्या हातांना अनेकदा जखमा झालेल्या आहेत. या काचा कधी बाटल्यांच्या कधी बल्बच्या आढळून यायच्या. याचवेळी घरातील बल्बही अदृश्य होऊ लागले. एकदा होल्डरमधून बल्ब अदृश्य झालेला पाहून मल्लाप्पाने विमलच्या धुण्यासाठी टाकलेल्या साडीत तो सापडतो का हे मुद्दाम पाहिले. साडी झाडून पाहिली. त्यात बल्ब नव्हता. म्हणून ती खाली टाकली. साडी खाली (फरशीवर) पडताच फट् असा आवाज झाला. आश्चर्य म्हणजे साडीत बल्ब फुटलेल्या काचा आढळल्या ! मी याविषयी मल्लाप्पाला साडी नीट पाहिली नसावी असे म्हणालो तेव्हां त्याने संपूर्ण साडी उलगडून पाहिल्याचे सांगितले. तो असेही म्हणाला की सहावारी साडीत मुद्दाम बल्ब हुडकणाऱ्याची नजर चुकवून तो दडून राहीलच कसा?

होल्डरमधून बल्ब आपोआप खाली (फरशीवर) पडून फुटण्याचाही एकदा प्रकार घडला. (असा प्रकार गळतगा गावी भानामतीचा शोध घेण्यास प्रस्तुत लेखक गेला असता त्याच्या समोरच प्रत्यक्ष घडला असल्याचे **विज्ञान व चमत्कार** या ग्रंथात

प्रकरण ९ मध्ये यापूर्वी सांगितलेच आहे.) धुण्यात काचेचे तुकडे आढळून वरचेवर जखमा होऊ लागल्यामुळे घरातील सर्व काचेच्या वस्तू घराबाहेर लांब नेऊन टाकण्यात आल्या. यात खोकल्याचे औषध असलेली बाटलीसुद्धा होती. आश्चर्य म्हणजे त्या बाटलीच्याच काचेचा तुकडा परत धुण्यात आढळला ! याला खोकल्याचे लालसर औषध लागले असल्यामुळे ते आपलेच असल्याचे मल्लाप्पाला ओळखता आले.

यानंतर मल्लाप्पाच्या हातातील घड्याळाचा पट्टा आपोआप तुटला. म्हणून त्याने नवीन विकत घेतला. तोही तुटला. तो 'पट्टा लेखकाने दुमडून, दाबून, ताणून इ. पद्धतीने पाहिला, तरी तुटला नाही म्हणजे तो अपघाताने तुटण्याची शक्यता नव्हती.

एकदा मल्लाप्पाची आई सकाळी अंघोळ करून, म्हणजे धुतलेली साडी नेसून टी. व्ही. पाहण्यासाठी येऊन बसली. मल्लाप्पाही जवळच बसला होता. इतक्यात मल्लाप्पाला कापड जळत असल्याचा वास आला. त्याच्या आईलाही गुडघ्याजवळ गरम लागले. म्हणून तिने पाहिले, तर गुडघ्याजवळ साडी जळत असल्याची दिसली. ती लगेच विझवण्यात आली. साडीला जळाल्यामुळे एक बंदा रुपयाइतके भोक मात्र पडले.

मल्लाप्पाचा सात वर्षांचा भाचा (बहिणीचा मुलगा) मल्लाप्पाच्या घरीच राहायला आहे. तो एकदा रात्री झोपेतून घाबरून रडत उठला. त्याला काय झाले असे विचारता एक घोंगडे पांघरलेला माणूस आपला गळा दाबत होता असे तो म्हणाला. तो रडत उठला त्याचवेळी जवळच झोपलेल्या विमलच्या डोक्यावर विष्ठा व चटणी पडली. तिच्याजवळच्या मुलावरही ती पडली, व तेही रडू लागले न एकच गोंधळ उडाला.

अशी ही. हेरवाडची एकाच कुटुंबाला सात आठ वर्षे या ना त्या स्वरूपात सतत भंडावणारी भानामती ! बातमीत अंधश्रद्धा निर्मूलन समितीला हे आव्हान आहे असे म्हटल्यामुळे जिची समितीच्या लोकांना इच्छेविरुद्ध दखल घ्यावी लागली व जिच्यापुढे त्यांना नाक पासावे लागले अशी भानामती असे म्हणण्याचे कारण १५ सप्टेंबर १९९३ रोजी (अमावस्येच्या दिवशी) 'अंनिस'चे दोघेजण मल्लाप्पाच्या घरी आले व तो बंद

झाली नसल्याचे कळल्यामुळे "ही भानामती आम्हाला कळत नाही येवून पुढे आम्ही येणार नाही." असे म्हणाले आणि त्यांनी हा शब्द अक्षरश: पाळला !

हेरवाडच्या भानामतीने ही 'अंनिस'ची केलेली फजिती पाहून कुणी असा ग्रह करून घेईल, की येथून पुढे तरी 'अंनिस' भानामती हे एक अतिप्राकृतिक सत्य आहे हे मान्य करील. पण सत्य आणि 'अंनिस' हे एकत्र कधीच नांदत नाहीत. थोड्याच दिवसात सांगलीत या लोकांची जी एक बैठक झाली तीमध्ये या लोकांनी चबक जाहीर केले की हेरवाडची भानामती खोटी असून तो प्रकार घरची मुख्य व्यक्ती विमल हीच करते ! याला पुरावा काय? विचारू नका ! आधार काय? विचारू नका ! समितीच्याच लोकांनी मल्लाप्पाच्या घरी येऊन या भानामतीपुढे सपशेल लोटांगण घातले होते. या वस्तुस्थितीचे काय ? विचारू नका ! असले प्रश्न उपस्थित करणे हे अंधश्रद्धेचे लक्षण आहे अंधश्रद्धा नाही ती फक्त या 'सत्यशोधक' समितीच्या लोकांकडेच !

**टीप :**- या भानामतीविषयीचा एक प्रस्तुत लेखकाचा आश्चर्यकारक

अनुभव येथे सांगितला पाहिजे. प्रस्तुत लेखकाच्या माहितीतील एका व्यक्तीकडे मल्लाप्पा व विमल यांना घेऊन त्यांच्या भानामतीवर उपचार शोधण्यासाठी तो गेला असता मल्लाप्पाने व त्याच्या कुटुंबियांनी लेखकाला यापूर्वी कधीही न सांगितलेल्या काही गोष्टी तेथे त्या व्यक्तीने सांगितल्या. त्या व्यक्तीची मल्लाप्पाला व त्याच्या कुटुंबियांना माहिती तर नव्हतीच, पण यापूर्वी त्या खेड्याचे नावसुद्धा त्यांनी ऐकले नव्हते. त्या व्यक्तीने विमलचे स्तनाचे दूध नाहीसे झाल्याचे सांगितले. याचा परिणाम म्हणून विमलचा एक स्तन पूर्ण खुरटला होता हे खरे होते. पण प्रस्तुत लेखकाला ही गोष्ट त्या लोकांनी सांगितली नव्हती. तसेच घरासमोरची तुळस वाळली होती, तसेच भात कधी कधी लाल होत होता. हेही खरे असल्याचे त्यांनी मान्य केले. याशिवाय मल्लाप्पालाही माहिती नसलेली, पण फक्त एकट्या विमलला माहीत असलेली एक गोष्ट त्या व्यक्तीने सांगितली. ती म्हणजे विमल लहान असताना आपल्या आजोळी एकदा गेली असता तिला त्या गावच्या अपघातात मेलेल्या एका व्यक्तीची 'बाधा' झाली होती (म्हणे). हे खरे असल्याचे व त्यासाठी एक मंतरलेला ताईत ती वापरत असल्याचेही तिने मान्य केले. त्या व्यक्तीने

भानामतीचे खरे कारण सांगून उपचार सुचविला. त्याचा थोडा परिणाम नंतर दिसून आला. पण ती पूर्ण बंद झाली नाही. ती पुढे हळूहळू कमी होत एक वर्षाने बंद झाली.